

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दूरध्वनी क्रमांक-२२७९४२५७ Email ID : Desk 14b.gad-mh@gov.in

.......................................................................................................................

क्रमांक : कअनि-११२१/प्र.क्र.७२/१४-ब दिनांक : ०१ ऑक्टोबर, २०२१

प्रति,
सह/उप सचिव (आस्थापना)
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

**विषय :** विधी व न्याय विभागाच्या अधिपत्याखालील देवस्थान व्यवस्थापन समिती, पश्चिम महाराष्ट्र कोल्हापूर या कार्यालयातील सचिव या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याबाबत.

**संदर्भ :** सा.प्र.वि.शा.नि.क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१२०/कार्या-१४, दि.३१.०८.२०१७

महोदय/महोदया,

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये मंत्रालयीन संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीबाबत कार्यपध्दती विहीत करण्यात आली आहे. सदर कार्यपध्दतीनुसार विधी व न्याय विभागाच्या अधिपत्याखालील देवस्थान व्यवस्थापन समिती, पश्चिम महाराष्ट्र कोल्हापूर या कार्यालयातील सचिव (वेतनस्तर रु.१५६००-३९१०० + ग्रेड पे रु.५४००-सहावा वेतन आयोग) हे पद मंत्रालयीन कक्ष अधिकारी संवर्गातून प्रतिनियुक्तीने भरावयाचे आहे. त्यानुसार देवस्थान व्यवस्थापन समिती, पश्चिम महाराष्ट्र कोल्हापूर या कार्यालयातील सचिव हे पद प्रतिनियुक्तीने भरण्यासाठी मंत्रालयीन विभागातील कक्ष अधिकारी संवर्गातील [सातवा वेतन आयोग वेतनस्तर एस-२० (रु.५६१००-१७७५००)] अधिकाऱ्यांकडून इच्छुकता मागविण्यात येत आहे.

२. सर्व मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, सदर पत्र आपल्या विभागाच्या आस्थापनेवरील कक्ष अधिकाऱ्यांच्या तात्काळ निदर्शनास आणावे. त्यानुसार प्रतिनियुक्तीसाठी इच्छुकता दर्शविलेल्या कक्ष अधिकाऱ्यांची सोबतच्या विवरणपत्रातील माहिती विभागाच्या सचिवांच्या मान्यतेने या विभागास दि.२०.१०.२०२१ पर्यंत उपलब्ध करुन द्यावी.

३. सदर पत्राची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक संकेतांक २०२११००११७२८३८६००७ असा आहे. सदर पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

आपला,

Gajanan
Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2021.10.01 17:31:45 +05'30'

( ग. भि. गुरव )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

उप सचिव (का.१६), विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.